**महाराष्ट्र संशोधन, उन्नती व प्रशिक्षण प्रबोधिनी (अमृत), पुणे या संस्थेच्या व्यवस्थापकीय संचालक यांना "विभाग प्रमुख" म्हणून घोषित करणे.**

**महाराष्ट्र शासन**
**इतर मागास बहुजन कल्याण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक - अमृत २०२३/ प्र.क्र.१८/संस्था**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक- २० मार्च, २०२३

**वाचा-**

१) इतर मागास बहुजन कल्याण विभाग, शासन निर्णय, क्र. प्रसंस्था २०१९/ प्र.क्र.१००/महामंडळे,दि. २२/०८/२०१९
२) इतर मागास बहुजन कल्याण विभाग, शासन निर्णय, क्र, अमृत २०२०/प्र.क्र. १०/संस्था (अमृत),दि २८.०६.२०२१
३) इतर मागास बहुजन कल्याण विभाग, शासन निर्णय, क्र प्रसंस्था २०१९/ प्र.क्र.१००/संस्था,दि.१२/०८/२०२२
४) इतर मागास बहुजन कल्याण विभाग, शासन निर्णय, क्र. अमृत-२०२१ प्र.क्र.५२/संस्था,दि.३०/०८/२०२२
५) बॉडी ऑफ गव्हर्नन्स च्या दिनांक २७ फेब्रुवारी २०२३ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त

**प्रस्तावना-**

खुल्या प्रवर्गातील आर्थिक दृष्ट्या दुर्बल घटकातील विद्यार्थी, युवक-युवती व इतर उमेदवारांकरिता विविध उपक्रम, प्रशिक्षण, संशोधन, कार्यक्रम, योजना इत्यादी राबविण्यात येऊन तसेच इतर माध्यमातूनही त्यांचा विकास घडविण्यासाठी संदर्भ क्र.१ येथील नमूद दि.२२.०८.२०१९ च्या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र संशोधन, उन्नती व प्रशिक्षण प्रबोधिनी (अमृत) या संस्थेची स्थापना करण्यात आली आहे. सदर संस्थेची नोंदणी रजिस्ट्रेशन ऍक्ट ( Society Registration Act १८६० ) आणि सार्वजनिक विश्वस्त व्यवस्था अधिनियम १९५० ( सन १९५० चा मुंबई अधिनियम क्रमांक २९ ) अंतर्गत करण्यात आलेली आहे. तद्नंतर सदर संस्थेचे मुख्यालय पुणे येथे करण्यास संदर्भ क्र.३ येथील नमूद दि.१२.८.२०२२ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे. त्याचप्रमाणे अमृत या संस्थेकरिता ३ नियमित व १७ बाह्य यंत्रणेव्दारा घ्यावयाच्या सेवा अशा एकूण २० पदांच्या निर्मितीसाठी संदर्भ क्र.४ येथील नमूद ३०.०८.२०२२ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे.

सद्यस्थितीत अमृत या संस्थेच्या व्यवस्थापकीय संचालक पदी अप्पर जिल्हाधिकारी संवर्गातील अधिकाऱ्याची नियुक्ती करण्यात आलेली आहे.

अमृत संस्थेच्या पुणे येथे मुख्यालयाकरिता जागा शोधणे, निर्माण केलेली पदे भरणे, फर्निचर व इतर सर्व आवश्यक कामे करणे, विभागीय पातळी, जिल्हा पातळी तसेच तालुका पातळीवरील कार्यालयासाठी आवश्यक ती रचना, नेमणुका, कार्यपद्धती इत्यादी ठरविणे, महाराष्ट्रभर विविध योजना, प्रशिक्षण, संशोधन, कार्यक्रम इत्यादी ठरविणे व त्याची प्रभावीपणे अंमलबजावणी करण्यासाठी व्यवस्थापकीय संचालक (अमृत) यांना वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग पहिला, उपविभाग एक, अनुक्रमांक एक, नियम क्रमांक २ अन्वये "विभाग प्रमुख" घोषित करण्यास व विभाग प्रमुख या नात्याने त्यांना सर्व प्रशासकीय व वित्तीय अधिकार प्रदान करण्यास अमृत संस्थेच्या बॉडी ऑफ गव्हर्नन्स च्या दिनांक २७ फेब्रुवारी २०२३ च्या बैठकीमध्ये ठराव मंजूर करण्यात आला आहे.

त्यानुसार महाराष्ट्र संशोधन, उन्नती व प्रशिक्षण प्रबोधिनी (अमृत) संस्थेचे व्यवस्थापकीय संचालक यांना "विभाग प्रमुख" घोषित करण्याची व विभाग प्रमुख या नात्याने त्यांना सर्व प्रशासकीय व वित्तीय अधिकार प्रदान करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

अमृत संस्थेच्या बॉडी ऑफ गव्हर्नन्स च्या दिनांक २७ फेब्रुवारी २०२३ च्या बैठकीतील मान्यतेनुसार महाराष्ट्र संशोधन, उन्नती व प्रशिक्षण प्रबोधिनी (अमृत) या संस्थेचे व्यवस्थापकीय संचालक यांना वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग पहिला, उपविभाग एक, अ.क्र.१, नियम क्रमांक २, अन्वये " विभागप्रमुख " म्हणून घोषित करण्यात येत आहे. वित्तीय अधिकार नियम पुस्तिकेतील अटीनुसार सदर अधिकार हे वित्तीय मर्यादेपुरतेच राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२३०३२९१५३७४८८६३४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

KAILAS TARACHAND SALUNKE

Digitally signed by KAILAS TARACHAND SALUNKE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=OTHER BACKWARD BAHUJAN WELFARE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c550dd52f3943153bdbd47e381bb9818c91359bd0588e1b35b3c0c18ad7bf938, pseudonym=B6DDBEDBC1E63E4332429DB625320D8F56899C89, serialNumber=35C845457FD4B891124529DBD2192A0E21273AD7339A5CA3B170A0E91352CED7, cn=KAILAS TARACHAND SALUNKE
Date: 2023.03.29 15:42:38 +05'30'

**( कैलास साळुंके )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा राज्यपाल यांचे सचिव, मलबार हिल, मुंबई
२. मा मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
३. मा मंत्री,/मा राज्यमंत्री, (इतर मागास बहुजन कल्याण.)यांचे खाजगी सचिव
४. मा विरोधी पक्षनेता, विधान परिषद/विधानसभा,विधान भवन, मुंबई
५. मा मुख्य सचिव,मंत्रालय, मुंबई
६. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, वित्त विभाग, मंत्रालय ,मुंबई
७. अपर मुख्य सचिव, इतर मागास बहुजन कल्याण विभाग,मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक
८. सर्व सहसहचिव/ उपसचिव, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय मुंबई
९. उपसचिव/कक्ष अधिकारी, अर्थसंकल्प, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय मुंबई
१०. संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, म. रा. पुणे
११. सर्व अवर सचिव/ कक्ष अधिकारी, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय मुंबई
१२. कक्ष अधिकारी, विनियमन/व्यय१४ कार्यासन, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. महालेखापाल, महाराष्ट्र १ (लेखापरीक्षा/लेखा अनुज्ञेयता) मुंबई १९
१३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१४. सर्व कोषागार अधिकारी
१५. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र संशोधन, उन्नती व प्रशिक्षण प्रबोधिनी (अमृत), पुणे
१६. निवड नस्ती.